अन्न सुरक्षा कार्य प्रणालीचे बळकटीकरण करणेकरीता अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण, नवी दिल्ली व अन्न सुरक्षा आयुक्त (राज्य शासन) यांचेमध्ये सामंजस्य करार (MoU)करणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०२१/प्र.क्र.०१/औषधे-२**

**गो. ते. रुग्णालय आवार ईमारत, ९ वा मजला,**

**लो. टिळक मार्ग, मंत्रालय मुंबई ४०० ००१**

**दिनांक : १६ फेब्रुवारी, २०२२**

**वाचा :-**

१. अन्न सुरक्षा व मानदे प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांचे दि ६/७/२०२० रोजीचे पत्र.
२. अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांचे पत्र क्र. File No. ४(४४)२०२०/MoU/FSSAI & States/UTs/RCD/FSSAI दि. ४/३/२०२१
३. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांनी अन्न सुरक्षा व मानदे प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांना सादर केलेला दि. १६/७/ २०२१ चा बळकटीकरणचा आराखडा
४. अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांचे दि. २/१२/२०२१ चे पत्र.
५. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांचे पत्र क्र. नियोजन/असुकाप्रब/११०३-२०/२०, दि. ३०/१२/२०२० व दि. ११/२/२०२१

**प्रस्तावना :-**

अन्न व औषध प्रशासन, मुंबई मधील अन्न विभागाकडुन अन्न सुरक्षा व मानके अधिनियम, २००६ ची अंमलबजावणी केली जाते. राज्यातील जनतेस सुरक्षित व निर्भेळ अन्न पदार्थ उपलब्ध करुन देणे हा या कायद्याचा मुख्य उद्देश आहे. अन्न पदार्थांचे उत्पादन, विक्री, साठवणुक , वितरण व वाहतुक यांचे नियमन करणेकरीता केंद्र शासनाने सदर कायदा अधिनियमित केला आहे. सदर कायद्याअंतर्गत अन्न पदार्थांची मानके ठरविणे, नियम व नियमने तयार करणे, कायद्याची अंमलबजावणी करण्याबाबत राज्यांना मार्गदर्शक तत्वे निर्गमित करणे या करीता अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण(FSSAI) यांची स्थापना करण्यात आली आहे. अन्न पदार्थांच्या सुरक्षिततेबाबत अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI) ही केंद्र शासनाची राष्ट्रीय पातळीवरील सर्वोच्च संस्था आहे. अन्न सुरक्षा व मानके अधिनियम २००६

अंतर्गत नियम व नियमनांवर आधारीत तरतुदींच्या अंमलबजावणीची प्राथमिक जबाबदारी राज्यशासनाची आहे.

२. राज्यातील अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण करण्याकरीता अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI) यांनी सामंजस्य कराराच्या माध्यमातुन सन २०२१-२२ व सन २०२२-२३ अशी दोन वर्षाची योजना तयार केली आहे. या सामंजस्य कराराचा प्रमुख उद्देश हा राज्याच्या अन्न सुरक्षा कार्यप्रणालीतील उणिवा दूर करून सुरक्षित आणि आरोग्यदायी अन्न संस्कृतीला चालना देणे हा आहे . सदर सामंजस्य कराराची उद्दिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत.

१. अन्न सुरक्षा व मानके अधिनियम, २००६ अंतर्गत राज्यातील अंमलबजावणी आणि अनुपालन प्रणाली सक्षम करणे.
२. राज्यातील अन्न चाचणी प्रणाली सक्षम करणे.
३. ईट राईट इंडिया मुव्हमेंट अंतर्गत विविध उपक्रमांची राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी करणे.
४. अन्न सुरक्षा सुनिश्चित करण्यासाठी आवश्यक असणारी इतर कोणतीही बाब.

३. अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रानुसार अन्न सुरक्षा कार्य प्रणालीचे बळकटीकरण करणेकरीता अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण, नवी दिल्ली व राज्य शासन यांचे मध्ये सामंजस्य करार (MoU)करणे बाबत आयुक्त , अन्न व औषध प्रशासन,मुंबई यांना कळविले होते. तसेच संदर्भ क्र. २ नुसार सदर योजनेंतर्गत सन २०२१-२२ या कालावधीकरीता सामंजस्य करार (MoU) अंतर्गत कृति आराखडा सादर करण्याबाबत कळविले होते. संदर्भ क्र. ३ नुसार अन्न सुरक्षा आयुक्त , अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य यांनी सामंजस्य करार (MoU) अंतर्गत कृति आराखडा अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण, नवी दिल्ली यांना सादर केला होता. संदर्भ क्र. ४ नुसार सदर कृति आराखड्यास अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण यांचेकडून मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये सदर योजनेंतर्गत अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण, नवी दिल्ली यांचे समवेत सामंजस्य करार करणेकरीता अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांनी मान्यता देणेबाबत

शासनास विनंती केली होती. या सामंजस्य करारास मंत्रीमंडळाची मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर सामंजस्य करार करण्यास व त्याअंतर्गत सन २०२१-२२ च्या कृती आराखड्यास मंत्रीमंडळाच्या दि. २/२/२०२२ च्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

(अ) अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण या योजनेअंतर्गत अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली व अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य यांच्यामध्ये राज्यातील अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरणासाठी प्रथम दोन वर्षांसाठी व त्यानंतर परस्पर संमतीने पुढील कालावधीसाठी सामंजस्य करार करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सामंजस्य करारामध्ये सन २०२१-२२ साठी मान्यता दिलेल्या कृती आराखड्याप्रमाणे व उपलब्ध करून दिलेल्या निधीनुसार पुढील कार्यवाही करावी. सन २०२२-२३ साठी अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI), नवी दिल्ली यांच्यासोबत कृती आराखडा निश्चीत करून ४०% राज्य हिश्याच्या खर्चाची तरतूद करण्यासाठी शासनास प्रस्ताव पाठवावा.

(ब) अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण ( सेंट्रल सेक्टर स्कीम व्यतिरिक्त ) या योजनेमध्ये अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण (FSSAI) व राज्य शासन यांच्या खर्चाचा हिस्सा अनुक्रमे ६०: ४० असा राहणार आहे. त्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण यांचे कडुन प्राप्त होणारा निधी अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांचे खात्यामधे जमा करुन घेण्याकरीता अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य यांचे नावे राष्ट्रीयीकृत बँकेत चालु खाते (Current Account)उघडण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

(क) आर्थिक वर्ष सन २०२१-२२ साठी अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण या योजनेअंतर्गत एकूण रु. २१०३.८३ लाख निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी सेंट्रल सेक्टर योजनेचा निधी (रु.५८७.६२ लाख ) वगळून उर्वरीत रु.१५१६.२१ लाख निधीमध्ये केंद्रशासन(FSSAI) व राज्यशासन यांच्या ६० : ४० या टक्केवारीप्रमाणे केंद्र हिस्सा (FSSAI) म्हणून रु. ९०९.७२ लाख आणि राज्य हिस्सा म्हणून रु. ६०६.४९ लाख खर्च येणार आहे. ४०% राज्य हिश्श्यामध्ये वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या (अन्न व औषध प्रशासन) रु. ४१४.४९ लाख खर्चास आणि सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रु. १९२.०० लाख खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

(ड) आर्थिक वर्ष सन २०२१-२२ साठी चालू आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतूदीतून अन्न व औषध प्रशासनाच्या लेखाशिर्ष मागणी क्र.एस-४ ४२१० १०८४ मधून राज्याच्या ४०% हिश्श्याकरीता खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(इ) आर्थिक वर्ष सन २०२१-२२ मध्ये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या (२२१० १००८) या लेखाशिर्षा अंतर्गत १३- कार्यालयीन खर्च या बाबी खाली विभागाच्या बचतीमधून तरतूद पुनर्विनियोजनाने उपलब्ध करून घेऊन राज्य शासनाच्या ४०% हिस्स्यातील सार्वजनिक आरोग्य विभागाकडून रुपये १९२.०० लक्ष इतका निधी अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य यांच्या खात्यात वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ई) सामंजस्य करार स्वाक्षांकीत झाल्यानंतर पुढील आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये राज्य हिस्स्याचा निधी अर्थसंकल्पीत करण्याकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठीचा स्वतंत्र प्रस्ताव अन्न व औषध प्रशासनाने शासनास मान्यतेसाठी सादर करावा.

२. अन्नसुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण या योजनेअंतर्गत नमूद करण्यात आलेल्या कृती आराखड्यातील मनुष्यबळासाठी-

(अ) मंजूर पदांपैकी रिक्त पदांवर तात्पुरत्या स्वरुपात बाह्यस्रोताद्वारे कंत्राटी तत्वावर सेवा घेण्यासाठी सचिव उपसमितीची पूर्वमान्यता घ्यावी किंवा

(ब) काल्पनिक पदे निर्माण करुन तात्पुरत्या स्वरुपात बाह्यस्रोताद्वारे कंत्राटी तत्वावर सेवा घेण्यासाठी उच्चस्तर सचिव समितीची पूर्वमान्यता घ्यावी.

वरील (अ) किंवा (ब) येथील पर्यायानुसार स्वतंत्र प्रस्ताव अन्न व औषध प्रशासनाने शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ०४/१४७५, दि. १०.०१.२०२२ नुसार आणि वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २६/२२/को.प्र.-५, दि. ३१/१/२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१६१२५४३९८८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saurabh Vijay

Digitally signed by Saurabh Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1881d2db26e7def23bb04e11d8b1bf15f88a57c4334fada0f815b878b0a2d44f, serialNumber=557b72c5074661cf936fc5c18380d6316697d92ad38676d79a0ba3cdd2cc8ee6, cn=Saurabh Vijay
Date: 2022.02.16 13:10:49 +05'30'

**(सौरभ विजय)**
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.मंत्री, अन्न व औषध प्रशासन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मा.राज्यमंत्री, अन्न व औषध प्रशासन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वि.का.अ., मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई.

८. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई.

९. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई (२ प्रति).

१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

११.अधिदान व लेखादान अधिकारी, मुंबई.

१२.निवासी कोषागार अधिकारी, मुंबई.

१३.निवड नस्ती, औषधे-२.